**अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या वसतिगृहातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या आहाराकरीता रक्कम आधार संलग्न खात्यात जमा करणेबाबत**

**सन २०२३-२४ करीता निधी वितरण**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वसगृ २०२३/प्र.क्र.३९/का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च , २०२४

**वाचा-**

१. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१५/का-८, दि. २ मार्च, २०१०.
२. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.वसगृ-२०११/प्र.क्र.१३०/का-८, दि.२० डिसेंबर, २०११.
३. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ -२०१२/प्र.क्र.१६८/का-८,दि.२१ जून, २०१३.
४. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वसगृ -२०१२/प्र.क्र.१६८/का-८,दि.२८ जुलै, २०१५.
५. अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र. वआयो-२०१७/प्र.क्र.३१/१७/का-८, दि.१२ ऑक्टोबर, २०२१
६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२ एप्रिल, २०२३
७. जिल्हाधिकारी, वाशिम यांचे पत्र क्र. कक्ष-२१४/अल्प/म.स./कावि-४०/२०२४, दि.२० मार्च, २०२४
८. जिल्हाधिकारी, सोलापूर यांचे पत्र क्र. साशा/कार्या १ब /आर आर/२४२/२०२४, दि.२७ मार्च, २०२४
९. जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र. २०२४/सा.प्र./अल्पसंख्याक/कावि-८८, दि.२७ मार्च, २०२४
१०. जिल्हाधिकारी, चंद्रपुर यांचे पत्र क्र. साशा/कारुआ-१०/स्थानि-२/२०२४/२३५, दि.१८ मार्च, २०२४
११. जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्र. अल्पसंख्याक कक्ष/नियोजन/Hostel/२०२४, दि.२२ मार्च, २०२४

**प्रस्तावना -**

राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी वसतिगृहे बांधण्याबाबत संदर्भांकित क्रमांक १ येथील दिनांक २ मार्च, २०१० चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. अल्पसंख्याक विकास विभागामार्फत सुरु करण्यात आलेल्या शासकीय वसतिगृहात राहणा-या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांच्या (मुले/मुली) आहाराकरीता थेट रक्कम त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्याबाबतचा निर्णय दि.१२/१०/२०२१ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना आहार भत्त्याची देय रक्कम ही माहे जुलै ते नोव्हेंबर (पहिला टप्पा) व माहे डिसेंबर ते एप्रिल (दुसरा टप्पा) या पाच पाच महिन्याच्या कालावधीसाठी दोन टप्प्यात वितरीत करण्यात येणार आहे.

**२.** सदर योजनेसाठी सन २०२३-२४ करिता "मागणी क्र. झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण, २००, इतर कार्यक्रम, (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१)(३३) अल्पसंख्याक विद्यार्थी वसतिगृहासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ सी ५८२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.३,३६,७०,०००/- इतका सुधारीत अंदाज मंजूर करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ७ ते ११ च्या पत्रान्वये जिल्हाधिकारी यांनी अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या आहार भत्यासाठी दुस-या टप्प्याकरीता निधी वितरित करण्याची मागणी केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयास अनुसरुन सदरचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता असलेल्या वित्तीय बंधनाच्या मर्यादेस अनुसरुन जिल्हाधिकारी वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर यांना अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या आहार भत्यासाठी दुस-या टप्प्याकरीता एकूण **रु.१०,१३,२४१/- (अक्षरी रुपये दहा लाख तेरा हजार दोनशे एक्केचाळीस फक्त)** इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वसतिगृहाचे ठिकाण | पात्र लाभार्थी संख्या | अनुज्ञेय निधी |
|---|---|---|---|
| १. | शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम | ८ | १,१४,४०० |
| २. | शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर | ७ | १,०५,००० |
| ३. | शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पाथरी, जि. परभणी | १० | ६७,१२६ |
| ४. | शासकीय अल्पसंख्याक मुलींचे वसतिगृह, गंगाखेड, जि. परभणी | २ | १२,१०६ |
| ५. | शासकीय अल्पसंख्याक मुलींचे वसतिगृह,परभणी, जि. परभणी | १७ | १,४१,५६५ |
| ६. | शासकीय तंत्रनिकेतन, जिंतूर, जि. परभणी | ६ | २८,५४४ |
| ७. | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | ३० | ४,७२,५०० |
| ८. | शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर | ८ | ७२,००० |
| **(अक्षरी रुपये दहा लाख तेरा हजार दोनशे एक्केचाळीस फक्त)** | | **एकूण** | रु.१०,१३,२४१/- |

**४.** वरीलप्रमाणे जिल्हाधिकारी, वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर यांना त्यांच्या अधिपत्याखालील उपरोक्त तक्त्यात नमुद अल्पसंख्याक विद्यार्थिनींच्या आहार भत्यासाठी एकूण **रु.१०,१३,२४१/- (अक्षरी रुपये दहा लाख तेरा हजार दोनशे एक्केचाळीस फक्त)** एवढी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**५.** सदर तरतूद जिल्हाधिकारी, वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता जिल्हाधिकारी, वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर हे नियंत्रक अधिकारी आणि जिल्हाधिकारी यांनी प्राधिकृत केलेले त्यांच्या कार्यालयातील दुय्यम अधिकारी - आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

**६.** सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर यांची राहील. तसेच अतिप्रदान व अखर्चित निधी परतावा शासनास भरणा (जमा) करण्याबाबत वित्त विभागाच्या सूचनांनुसार संबधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

**७.** सदरचा खर्च करताना वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C. च्या मार्गदर्शक तत्वांचा / CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची दक्षता संबधित जिल्हाधिकारी

यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी जिल्हाधिकारी वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

८. सदरचा खर्च "मागणी क्र. झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण, २००, इतर कार्यक्रम, (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१)(३३) अल्पसंख्याक विद्यार्थी वसतिगृहासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ सी ५८२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ करिता उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उपविभाग-एक मधील अट क्र.२७ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत व वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील कार्यपद्धती व अटींची पुर्तता करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०२४०३२८१७४८२७७०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANAND NARAYANRAO BHONDVE

Digitally signed by ANAND NARAYANRAO BHONDVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=a11586f7ebf5942c9727d91c8c251f01dab61da28a62264d92646e4dc3827d4d,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D040EF80427E869FA7C6F2F326EAF61F9B4591294C9BE6229580E816D54D3859, cn=ANAND NARAYANRAO BHONDVE
Date: 2024.03.28 17:58:10 +05'30'

**(आ. ना. भोंडवे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई / नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व परीक्षा), मुंबई / नागपूर,
३. जिल्हाधिकारी, वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर
४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई,
५. संचालक, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण व शिक्षण संचालनालय, मुंबई
६. प्राचार्य/संचालक (शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम, शासकीय तंत्रनिकेतन, सोलापूर, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पाथरी, जि. परभणी, शासकीय अल्पसंख्याक मुलींचे वसतिगृह, गंगाखेड, जि. परभणी, शासकीय अल्पसंख्याक मुलींचे वसतिगृह,परभणी, जि. परभणी, शासकीय तंत्रनिकेतन, जिंतूर, जि. परभणी, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपुर)
७. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम, सोलापूर, परभणी, नांदेड व चंद्रपुर
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय-१) मंत्रालय, मुंबई
१०. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
११. कक्ष अधिकारी, का.७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उक्त रकमा संबंधिताना कृपया B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन देण्यात याव्यात.
१२. निवड नस्ती, कार्यासन का-८